**महाराष्ट्र राज्य लॉटरी**
महाराष्ट्र आकर्षक पुष्कराज या
सोडतीची बक्षिस रचना व कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
### शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांकः मरालॉ २०१५/प्रक्र २९-ब/ लॉटरी-२.

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १८सप्टेंबर,२०१५.

**वाचा :** शासन निर्णय क्र. मरालॉ-२०१२/प्र.क्र.२९-ब/लॉटरी-२,दिनांक २१/७/२०१५.

**शासन निर्णय शुध्दीपत्रक:**

वित्त विभाग, शासन निर्णय क्र. मरालॉ -२०१२ /प्र.क्र.२९-ब/लॉटरी -२, दिनांक २१/७/२०१५ अन्वये **आकर्षक पुष्कराज** या महाराष्ट्र राज्य परंपारिक साप्ताहिक लॉटरी सोडतीच्या बक्षिस रचना व कार्यपध्दतीत करण्यात आलेल्या किरकोळ बदलास मान्यता देण्यात आलेली आहे. प्रस्तुत शासन निर्णयाच्या परि.- २,९ व १० मध्ये पुढील प्रमाणे दुरूस्ती करण्यात येत आहे.-

१) परिच्छेद-२ मध्ये शेवटी "या स्पेशल तिकीट योजनेच्या एकूण तिकीटांची संख्या १००० इतकी असून तिकीटांचे क्रमांक ००० ते ९९९ असे असतील," असे नमूद आहे. या ऐवजी " **या स्पेशल तिकीट योजनेच्या एकूण तिकीटांची संख्या १००० इतकी असून तिकीटांचे क्रमांक १००० ते १९९९ असे असतील**," असे वाचण्यात यावे.

२) परिच्छेद-९ मध्ये तिसऱ्या ओळीत "या बक्षिस योजनेमध्ये स्पेशल तिकीटांची एकूण संख्या १००० इतकी असून त्यांचे क्रमांक ००० ते ९९९ अशी असतील," असे नमूद आहे. त्या ऐवजी "**या बक्षिस योजनेमध्ये स्पेशल तिकीटांची एकूण संख्या १००० इतकी असून त्याचे क्रमांक १००० ते १९९९असे असतील**," असे वाचण्यात यावे.

३) परिच्छेद-१० मध्ये "१०.१ पहिले बक्षिस रू.१०,०००/- : या स्पेशल तिकीटाचे क्रमांक ००० ते ९९९ या प्रमाणे असतील. या सोडतीसाठी ३ ड्रम वापरण्यात येतील व ते सोडतीच्या ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ठेवण्यात येतील. सर्व ३ ड्रम मध्ये ० ते ९ या क्रमांकाची प्रत्येकी १ चकती या प्रमाणे १० चकत्या टाकण्यात येतील," असे नमूद आहे. त्याऐवजी "१०.१ पहिले बक्षिस रू.१०,०००/- चे बक्षिस :- **या स्पेशल तिकीटांचे क्रमांक १००० ते १९९९ या प्रमाणे असल्याने या सोडतीसाठी ४ ड्रम वापरण्यात येतील व ते सोडतीच्या ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ठेवण्यात येतील. पहिल्या ड्रम मध्ये १ या क्रमांकाची १ चकती टाकण्यात येईल व उर्वरित ३ ड्रम मध्ये ० ते ९ या क्रमांकाची प्रत्येकी १ चकती याप्रमाणे १० चकत्या टाकण्यात येतील."** असे वाचण्यात यावे.

सदर शासन निर्णय शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०९१८१६१४३४७४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2015.09.18 16:17:38 +05'30'

**(माधव आव्हाड )**
कक्ष अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१. मा. मंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४.प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. अ.मु.स. (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६.पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
११. उप सचिव (राज्य लॉटरी), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४.उपसंचालक (वित्त व लेखा),महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय,शिवडी (पूर्व), मुंबई १५.
१५. निवड नस्ती, लॉटरी -२.